तात्काळ






**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
दालन क्र.५५७, ५ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दूरध्वनी क्र ०२२-२२७९४१७२/२२७९३३४४ Email ID : vrishali.bhingarde@nic.in

---

क्रमांक: एएससी १५२३/प्र.क्र.३६/१४-अ दिनांक : ०२ मार्च, २०२३.

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय** :- प्रतिनियुक्तीची पदे भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्याबाबत.

**संदर्भ**:-
१) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२,दिनांक १७-१२-२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४,दिनांक ३१-०८-२०१७.
३) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.सहा) यांचे पत्र क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.४६/सहा, दि. १७-११-२०२२.
४) सामान्य प्रशासन विभाग/लो.दि. कक्ष यांचा दि. ०६-०२-२०२३ रोजीचा प्रस्ताव
५) ग्राम विकास विभागाचा नस्ती क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०३/योजना-३ वरील प्रस्ताव

महोदय/महोदया,

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार खालील पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक व लिपिक-टंकलेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

| अ.क्र. | मंत्रालयीन विभागातील पदाचे नांव | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पदनाम व संख्या | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयीन पत्ता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | सहायक कक्ष अधिकारी<br>२ पदे | राज्य माहिती आयोग, खंडपीठ अमरावती, शासकीय विश्रामभवन जवळ, कॅम्प, अमरावती ४४४ ६०२ |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | **सहायक कक्ष अधिकारी** | **सहायक कक्ष अधिकारी**<br>**१ पद** | **उमेद-महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष, सिडको भवन, ५ वा मजला (दक्षिण कक्ष), सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई- ४००६१४** |
| ३ | **उच्चश्रेणी लघुलेखक** | **उच्चश्रेणी लघुलेखक**<br>**१ पद** | **इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे** |
| ४ | **लिपिक-टंकलेखक** | **लिपिक-टंकलेखक**<br>**१ पद** | **महाराष्ट्र राज्य लोकसेवा हक्क आयोग, कोकण महसुली विभाग, कक्ष क्र. ७२७, ७ वा मजला, कोकण भवन (विस्तार इमारत), नवी मुंबई- ४००६१४** |

३. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक व लिपिक-टंकलेखकांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही. संबंधित मंत्रालयीन विभागानी त्यांच्या विभागातील इच्छुक कर्मचाऱ्यांची शिफारस करतांना, सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ (अ)(८) मध्ये नमूद केल्यानुसार नियमित नियुक्तीपासून किमान ७ वर्षे सेवा कालावधी पूर्ण करत नाहीत, अशा कर्मचाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करू नये.

४. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दि. १५-०३-२०२३ पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | प्रथम नियुक्तीचा दिनांक | |
| ४) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ५) | शैक्षणिक अर्हता | |
| ६) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ७) | मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ८) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०२२ रोजीचे) | |
| ९) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| ११) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

५. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दि. १५-०३-२०२३ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

६. सद्य:स्थितीत मंत्रालयील सहायक कक्ष अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक व लिपिक-टंकलेखक संवर्गात मोठ्या प्रमाणात पदे रिक्त आहेत. यास्तव प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी नियुक्ती करण्यास विभागाने सहमती दिल्यास त्या कर्मचाऱ्याच्या बदल्यात/जागी संबंधित विभागास तातडीने कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही याची विभागांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०३०२१२१११११०२०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.03.02 12:15:18 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) सहसचिव/उपसचिव (का.सहा), सामान्य प्रशासन विभाग, १९ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२

२) सहसचिव/उपसचिव (लो.दि.कक्ष), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

३) सहसचिव/उपसचिव (योजना-३), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१

४) सहसचिव/उपसचिव (आस्था-२), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).